**मंत्रालयीन विभागातील अधिकाऱ्यांना तसेच कर्मचाऱ्यांना बदलीनंतरच्या विभागातील कामकाजाविषयीचे प्रशिक्षण प्रशासकीय विभागाच्या स्तरावर देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्र.परीक्षा-२०१०/प्र.क्र.१६/२०१०/१७

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक :- १६ सप्टेंबर, २०१०.

## परिपत्रक

मंत्रालयीन विभागातील अधिकाऱ्यांच्या तसेच कर्मचाऱ्यांच्या एका प्रशासकीय विभागातुन दुसऱ्या प्रशासकीय विभागात बदलीच्या कायद्यानुसार बदल्या झाल्यानंतर, त्या विभागातील कामकाजाची/कार्यक्रमांची तसेच नियमांची/कायद्यांची त्यांना पुरेशी माहिती नसल्यामुळे, त्या विभागातील कामकाज कार्यक्षमपणे हाताळण्यात त्यांना अडचणी येत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

२. उपरोक्त बाबींचे गांभीर्य विचारात घेऊन, कार्यालयीन कामकाज कार्यक्षमपणे व गतीमानतेने हाताळले जावे यासाठी मंत्रालयीन विभागातील अधिकाऱ्यांची तसेच कर्मचाऱ्यांची, बदलीच्या कायद्यानुसार एका प्रशासकीय विभागातुन दुसऱ्या प्रशासकीय विभागात बदली झाल्यानंतर, त्यांना बदलीनंतरच्या विभागातील कामकाजाची/कार्यक्रमांची सविस्तर माहिती होण्याच्या दृष्टीने, आवश्यक ते प्रशिक्षण देण्याबाबत सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या स्तरावर कार्यवाही करणे आवश्यक आहे.

३. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना कळविण्यात येते की, बदली झाल्यानंतर मंत्रालयीन प्रशासकीय विभागात रुजू झालेल्या अवर सचिव दर्जा पर्यंतच्या सर्व अधिकाऱ्यांना तसेच सर्व कर्मचाऱ्यांना बदलीनंतरच्या विभागातील कामकाज सक्षमतेने पार पाडता यावे यादृष्टीने, विभागातील सर्व कामकाजांची तसेच विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या सर्व कार्यक्रमांची/योजनांची व विभागाशी संबंधित असणारे सर्व नियम आणि कायदे इत्यादी बाबींची परिपूर्ण अशी माहिती, संबंधितांना करुन देण्याकरिता आवश्यक ते प्रशिक्षण, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या स्तरावर देण्याची कार्यवाही प्रतिवर्षी वेळीच करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**(वि.द.आठवले )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),

मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन विभाग) यांचे खाजगी सचिव,

उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग/१९, मंत्रालय, मुंबई-३२.

उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग/१२-अ, मंत्रालय, मुंबई-३२.

निवड नस्ती.